**सोलापूर महानगरपालिका-**
**सर्व प्रकारच्या परदेशी यंत्रसामुग्रीवर व औद्योगिक कच्चा माल, औषधे, उपकरणे यावरील सुधारीत जकात कर**
**सोलापूर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र.४५२, दिनांक ११/२/२००५, ठराव क्र.२०१, दिनांक २०/९/२००७ व ठराव क्र.२०४, दिनांक २०/९/२००७ निलंबित करण्याबाबत.**

२५८/नवि.१९
१५/९/०९

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
**शासन निर्णय** क्रमांकः सोमपा-१८०५/७२२/प्र.क्र.४१३/नवि-१९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांकः १८ ऑगस्ट,२००९

**वाचा:-** आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे जा.क्र. नआ/जकात/८/४/३२३, दिनांक १९/३/२००८ चे पत्र

**प्रस्तावना:-**

सोलापूर महानगरपालिकेतील सर्व प्रकारच्या परदेशी यंत्रसामुग्रीवर व औद्योगिक कच्चा माल, यावरील अंडर प्रोटेस्ट सदरी ४% जकात दर आकारण्यात येऊन १०% स्विकारलेल्या रक्कमेतून ६% रक्कम शासनाच्या मंजूरीनंतर परत करण्याबाबत सोलापूर महानगरपालिका सर्वसाधारण ठराव क्र.४५२, दिनांक ११/२/२००५ पारीत करण्यात आलेला आहे.

सदर ठराव सोलापूर महानगरपालिकेच्या आर्थिक हिताविरुध्द असल्याने विखंडीत करण्याकरीता महानगरपालिकेने शासनाकडे प्रस्ताव पाठविण्याबाबत शासन स्तरावर दिनांक ६/१०/०६ च्या टिप्पणीन्वये मान्यता घेण्यात आलेली आहे व त्यानुसार सोलापूर महानगरपालिकेस पत्र पाठविण्यात आले होते. तथापि, महानगरपालिकेने दिनांक ३/५/२००७ व दिनांक १५/१०/२००७ च्या पत्रान्वये ठराव क्र.२४३, दिनां २१/१०/२००५, क्र.४०६, दिनांक २४/१२/२००५, ठराव क्र.२०१, दिनाक २०/९/२००७ व ठराव क्र.२०४, दिनांक २०/९/०७ हे ठराव विखंडीत करण्याबाबत शासनास पत्रे पाठविली आहेत. त्यानुषंगाने ठराव क्र.२४३ व ४०६ हे दिनांक १२/१०/२००७ च्या शासन निर्णयान्वये विखंडीत करण्यात आले आहेत.

आता दिनांक १९/३/२००८ च्या पत्रान्वये आयुक्तांनी मूळ ठराव क्र.४५२, दिनांक ११/२/२००५, क्र.२०१, दिनांक २०/९/२००७ व क्र.२०४, दिनांक २०/९/२००७ हे विखंडीत करण्याकरीता पाठविले आहेत. सोलापूर महानगरपालिकेतील सर्व प्रकारच्या परदेशी यंत्रसामुग्री व औद्योगिक कच्चा माल यावरील अंडर प्रोटेस्ट सदरील ४% जकात दर आकारण्यात येऊन १०% दराने स्विकारलेल्या रक्कमेतून ६% रक्कम शासनाच्या मंजुरीनंतर परत करण्याबाबत मंजूर करण्यात आलेले आहेत. सदर ठरावाची अंमलबजावणी करणे सोलापूर महानगरपालिकेच्या आर्थिक हिताविरुध्द असलयाने सोलापूर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र.४५२, दिनांक ११/२/२००५, क्र.२०१, दिनांक २०/९/२००७ व क्र.२०४, दिनांक २०/९/२००७ हे मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५१ (१) अन्वये निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांनी प्रस्तावित केल्यानुसार सोलापूर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र.४५२, दिनांक ११/२/२००५, ठराव क्र.२०१, दिनांक २०/९/२००७ व ठराव क्र.२०४, दिनांक २०/९/२००७ हे सोलापूर महानगपालिकेच्या हिताविरुध्द असल्यामुळे मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५१ (१) अन्वये निलंबित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**[ आ.श्रा. जिवने ]**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

1. मा.मुख्यमंत्री महोदयांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
2. सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्टाफ ऑफिसर
3. आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर
4. कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, नवि-२९ (वेबसाईटवर प्रसिध्दीकरीता)
5. निवड नस्ती( कार्यासन नवि-१९)